केंद्र शासनाच्या निर्देशाप्रमाणे राज्यात १८१ या टोल फ्री क्रमांकाच्या Chief Ministers Helpline बाबत.......

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- संकीर्ण २०१३/प्र.क्र.२९०(भाग-२) /कार्या-२,**
नवीन प्रशासकीय इमारत, तिसरा मजला, मादाम कामा रोड,
हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०९ ऑक्टोबर, २०२०.

**वाचा :-**

१. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, क्रमांक-- संकीर्ण २०१३/प्र.क्र.२९०/कार्या-२, दिनांक १९/८/२०१४ व तदनंतरचे दि. ९/१०/२०१४ चे शुध्दिपत्रक.
२. शासन निर्णय , महिला व बाल विकास विभाग, क्रमांक- संकीर्ण-२०१३/प्र.क्र.२९०/का-२ दिनांक ९ मार्च, २०१७.
३. शासन निर्णय: महिला व बाल विकास विभाग, संकीर्ण २०१३/प्र.क्र.२९०/का-२, दिनांक १२ जुलै, २०१७.
४. माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई यांच्याशी SAAR, IT, मुंबई यांनी केलेला दि.८/८/२०१७ चे करारपत्र.
५. शासन निर्णय , महिला व बाल विकास विभाग, क्रमांक- संकीर्ण-२०१३/प्र.क्र.२९०/का-२ दिनांक २७.०३.२०१८
६. उपायुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र. जा.क्र.मबाविआ/मवि/का-६/BSNL/१८- १९ /४०५६/दिनांक :निरंक
७. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, संकीर्ण २०१३/प्र.क्र.२९०/का-२, दिनांक २६.०६.२०१९
८. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, क्रमांक:बीजीटी-२०१९/प्र.क्र.९८/का-२/दिनांक १०.०५.२०१९
९. उपायुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र. जा.क्र.मबाविआ/मवि/का- ६/BSNL/ २०१९-२० / २६०५/दिनांक :२४.०५.२०१९
१०. उपायुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र. जा.क्र.जाक्रमबाविआ/कार्या-६/मवि /१८१/१९-२०/५५६, दि.३.२.२०२०.
११. माहिती व तंत्रज्ञान विभाग यांचा दि.१६.१.२०२० रोजीचा ईमेल.
१२. शासन निर्णय , महिला व बाल विकास विभाग, क्रमांक- संकीर्ण-२०१३/प्र.क्र.२९०/का-२, दिनांक २६.२.२०२०

**प्रस्तावना :-**

महिला व बाल विकास विभागामार्फत दि. १९/८/२०१४ च्या आदेशान्वये राज्यात SAAR IT RESOURCES PVT. LTD. या संस्थेच्या मदतीने संकटग्रस्त पिडीत महिलांना तातडीने मदत पुरविण्यासाठी २४ तास माहिती उपलब्ध करुन देण्यासाठीच्या १८१ या टोल फ्री क्रमांकाच्या Chief Ministerus Helpline सुरू करण्यास सदरची हेल्पलाईन SARR IT RESOURCES PVT. L.T.D, मुंबई या संस्थेच्या मदतीने राज्यात सुरू करण्यात आली आहे.

२. सदर १८१ हेल्पलाईन सुरु ठेवण्यासाठी बीएसएनएल, मुंबई यांना दरमहा दुरध्वनी देयके अदा केली जातात. त्यास अनुसरुन, शासन निर्णय क्रमांक संकीर्ण -२०१३/प्र.क्र.२९०/का-२/ दि. २९.३.२०१९ अन्वये माहे फेब्रुवारी, २०१९ पर्यंतची देयके अदा करण्यास आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांना शासन मंजूरी देण्यात आली आहे. उपरोक्त क्र.१२ येथील शासन निर्णयान्वये दि.२६.२.२०२० रोजीच्या शासन निर्णयानुसार, माहे मार्च,२०१९ ते फेब्रुवारी, २०२० या कालावधीतील रु.३०,२४०/- प्रमाणे १२ महिन्यांचे प्रलंबित मानधन अदा करण्याकरीता रु.२९.०३ लक्ष इतका वितरीत निधी अदा होऊ शकला नाही. सदर देयके अदा करणे आवश्यक असल्याने आता, माहे मार्च, २०१९ ते फेब्रुवारी, २०२० या कालावधीतील एकुण १२ महिन्यांचे मानधन अदा करण्याकरीता SGST, CGST सह एकूण रु.३४.२५ लक्ष निधी वितरीत करण्याची बाब प्रस्तुत नस्तीवर विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

१८१ या टोल फ्री क्रमांकाच्या "Chief Ministers Helpline" संदर्भात, माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, मुंबई यांच्याशी SAAR IT, मुंबई या संस्थेच्या झालेल्या दि.८.८.२०१७ च्या नवीन करारनाम्यानुसार, १८१ हेल्पलाईन साठी नियुक्त करण्यात आलेल्या SAAR IT मधील १८१ या टोल फ्री क्रमांकरीता काम करणाऱ्या ८ कंत्राटी कर्मचाऱ्यांचे (३ शिफ्टमध्ये एकूण ५ (२+२+१) कर्मचारी तसेच प्राप्त कॉलचा अहवाल शासनास सादर करण्यासाठी ३ सुपरवायझर असे एकूण ८ कर्मचारी) मानधन अदा करण्यासाठी रु. ३०,२४०/- प्रमाणे १२ महिन्याचे माहे मार्च २०१९ ते फेब्रुवारी २०२० या कालावधीतील प्रलंबित असणारे SGST CGST सह रु.३४,२५,५९२/- (अक्षरी रु.चौतीस लाख पंचवीस हजार पाचशे ब्यान्नव फक्त) इतक्या मानधानाची रक्कम SAAR IT, मुंबई या संस्थेस अदा करण्यास या आदेशान्वये शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. उपरोक्त वाचा मधील क्र.१२ येथील शासन निर्णय , महिला व बाल विकास विभाग, क्रमांक- संकीर्ण - २०१३ / प्र.क्र.२९०(भाग-२)/का-२, दिनांक २६.२.२०२० अधिक्रमीत करण्यात येत आहे.

३. याकरीता आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांना आहरण, संवितरण व नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदरचा खर्च नियमानुसार होईल याची आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांनी दक्षता घ्यावी.

४. सदर शासन निर्णय महिती व तंत्रज्ञान संचालनालय, मुंबई यांच्या दि.८.८.२०१७ च्या करारपत्रास अनुसार निर्गमित करण्यात येत आहे .

५. सदरचा खर्च " मागणी क्रमांक - एक्स-१, २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, ००१ संचालन व प्रशासन, (०५) (०१) जनजागृती, प्रसिध्दी, प्रशिक्षण आणि मुल्यमापन (२२३५-ए-९०१) योजनांतर्गत योजना या लेखाशिर्षाखाली, २०- इतर प्रशासकीय खर्च या उद्दिष्टांसाठी सन २०२०-२१ च्या आर्थिक वर्षातील उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा.

६. "१८१" ही हेल्पलाईन सर्वसमावेशक अशा मुख्यमंत्री हेल्पलपाईन मध्ये Merge करण्यात आली असल्याबाबत माहिती व तंत्रज्ञान विभागास तसेच SAAR IT PVT. LTD., MUMBAI संस्थेस तसेच माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई यांना कळविण्यात आले आहे. दि. १ मार्च,२०२० पासून संबंधीत ८ कंत्राटी कर्मचाऱ्यांचे मानधन माहिती व तंत्रज्ञान विभागार्फत करण्यात यावे.

७. हा शासन निर्णय वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र. १७८१, दि.२२.९.२०२० अन्वये दिलेल्या मान्यतेस अनूसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२०१००९१३११२६५०३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

RAVINDRA SITARAM JARANDE

Digitally signed by RAVINDRA SITARAM JARANDE
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=186d0f0fdd27c79b9b3f859a90ec537946c37d5876e64ce525d082e58e494c85, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBA,
serialNumber=4d2dc3dbd5c0f35a66a84c93b4cead367c64cc2bc9d7391e9a053988a2f81b64, ou=WOMEN AND CHILD DEVLOPMENT,
o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=RAVINDRA SITARAM JARANDE
Date: 2020.10.09 13:13:25 +05'30'

**( र. सी. जरांडे )**

उप सचिव (अ.का.) महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. सचिव, (महिला व बाल विकास) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
२. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
३. संचालक, माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, मुंबई
४. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखा परिक्षा) - मुंबई / नागपूर,
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
७. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
८. सर्व महिला व बाल विकास अधिकारी / बाल विकास प्रकल्प अधिकारी
९. व्यवस्थापक, SAAR IT, मुंबई.